<u>महाराष्ट्र राज्य लॉटरी</u>
**महाराष्ट्र सह्ययाद्री या मासिक सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**सुधारित शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांकः मरालॉ- २०१७/ प्र.क्र.८९ / लॉटरी-२**
महाराष्ट्र राज्य लॉटरी, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ११ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा</u> : १.वित्त विभाग, शासन निर्णय ,क्रमांकः मरालॉ- २०१७/ प्र.क्र.८९ /लॉटरी-२ दि.२५/०७/२०१७.
२. उपसंचालक (वित्त व लेखा),महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचे पत्र क्र. उपसं (वि व ले)/मरालॉ/ योजना /२२२०/ १७, दि.२०/०७/२०१७.
३. उपसंचालक (वित्त व लेखा),महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचे पत्र क्र. उपसं (वि व ले)/मरालॉ/ योजना /३१०२/ १८, दि.१०/०९/२०१८.

**<u>सुधारित शासन निर्णय शुध्दीपत्रक :</u>**

शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांकः मरालॉ- २०१७/ प्र.क्र.८९ / लॉटरी-२,दि.०४/०९/२०१८ **रद्द** करण्यात येऊन सदरचे सुधारित शासन निर्णय शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य लॉटरीची ऑगस्ट,२०१७ पासून काढण्यात येणाऱ्या महाराष्ट्र सह्ययाद्री या मासिक सोडतीची बक्षिस रचना व सोडतीच्या कार्यपध्दतीस संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. मरालॉ- २०१७/ प्र.क्र.८९ / लॉटरी-२ दि.२५/०७/२०१७ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. प्रस्तुत शासन निर्णयाच्या परिच्छेद ७ मधील तक्त्यातील दहाव्या बक्षिसाबाबत पुढील प्रमाणे नमूद आहे-

| **बक्षिसे** | **बक्षिसाची रक्कम (रु.)** | **प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या** | **सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या** | **सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम (रु.)** |
|---|---|---|---|---|
| दहावे बक्षिस (शेवटचे ४ अंक) काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास रु. १००/- बक्षिस देण्यात येईल.) | १०० | -- | ३०००० | ३०,००,००० |

तसेच परिच्छेद ८ मधील उप परिच्छेद ८.७ मध्ये -

"**<u>दहावे बक्षिस रू. १००/- :</u>** दहाव्या रु. १००/- च्या बक्षिसासाठी कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल व त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० व्या क्रमांकास रू. १००/- चे दहावे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल", असे नमूद केलेले आहे.

**या ऐवजी** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. मरालॉ २०१७/प्र.क्र.८९/ लॉटरी-२, दि.२५/०७/२०१७ च्या परिच्छेद ७ मधील तक्त्यातील दहाव्या बक्षिसाबाबत पुढील प्रमाणे नमूद आहे, असे वाचण्यात यावे.

| **बक्षिसे** | **बक्षिसाची रक्कम (रु.)** | **प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या** | **सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या** | **सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम (रु.)** |
|---|---|---|---|---|
| **दहावे बक्षिस** (शेवटचे ४ अंकावर कोणतेही १००० क्रमांक संगणकावर रॅन्डम पध्दतीने काढण्यात येतील.) ( सर्व मालिकांसाठी) | १०० | -- | ३०००० | ३०,००,००० |

तसेच परिच्छेद ८ मधील उप परिच्छेद ८.७ मध्ये -

"**दहावे बक्षिस रू. १००/- :** दहाव्या रु. १००/- च्या बक्षिसासाठी संगणकावर ४ अंकाचे कोणतेही १००० स्वतंत्र भाग्यवान क्रमांक रॅन्डम पध्दतीने काढण्यात येतील व ते क्रमांक सर्व मालिकांसाठी रू.१००/- च्या दहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील" असे नमूद आहे, असे वाचण्यात यावे.

३. तसेच या सह्याद्री मासिक सोडतीचे आणि सागरलक्ष्मी, पद्मीनी, अक्षय, आकर्षक पुष्कराज, वैभवलक्ष्मी, महाराष्ट्रलक्ष्मी व महाराष्ट्र गजलक्ष्मी (रविवार) या साप्ताहिक सोडतींचे शेवटचे बक्षिस रॅन्डम पध्दतीने काढण्याच्या कार्यपध्दतीमध्ये दि.१४/०९/२०१८ पासून बदल करण्यात यावा.

४. सदर सुधारित शासन निर्णय शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१११७४३०१९१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33f159af855e668523427acf7322c4c3427aed8bf6b0bf7eb4dfdd5490c3d843, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2018.09.11 17:48:52 +05'30'

**( माधव आव्हाड )**
कक्ष अधिकारी तथा राज्य लॉटरी अधिकारी,
वित्त विभाग.

**प्रति,**

१. मा. मंत्री ( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, राज्य लॉटरी,वित्त विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई-३२.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सह सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय,वाशी, नवीमुंबई.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ लेखाधिकारी, (लॉटरी संचालनालय), अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी- २.